राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील केंद्र शासनाकडून पुनर्जिवित करुन दिलेला निधी वितरीत करणेबाबत.
(लेखाशिर्ष २४०१ A७४४ व २४०१ A७५३)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८ / प्र.क्र.११ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २३ ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा -</u>

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
२) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक ७-३/२०१८-आरकेव्हीवाय, दिनांक २.०५.२०१८.
३) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. राकृवि -०८१७ / प्र. क्र.९५/ १४-अे.

**शासन निर्णय-**

राज्यात केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र.टी-५ , २४०१, पीक संवर्धन, ७९६-जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (३२) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य ( केंद्र हिस्सा ६० %), (२४०१ अे७४४), ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. ४८००.०० लाख व राज्य हिस्स्याकरीता (०१) (३३) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य ( राज्य हिस्सा ४० %), (२४०१ अे७५३), ३३-अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. २२००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. आता, केंद्र शासनाने संदर्भ क्र. २ येथील पत्राद्वारे उपरोक्त योजनेसाठीचा सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील अखर्चित असलेला अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीचा रु. ७००.०० लाख इतका निधी सन २०१८-१९ या वर्षात खर्च करण्यासाठी पुनर्जिवित केलेला आहे. यानुषंगाने कृषि व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ येथील प्रस्तावास अनुसरुन (०१) (३२) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य ( केंद्र हिस्सा ६० %), (२४०१ अे७४४), ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. ७००.०० लाख व समरुप राज्य हिस्स्याकरीता (०१) (३३) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य ( राज्य हिस्सा ४० %), (२४०१ अे७५३), ३३-अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. ४६७.०० लाख असा एकूण रु.११६७.०० लाख ( अक्षरी रुपये अकरा कोटी, सदुसष्ट लाख फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव (कृषी), कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. विभाग प्रमुख व नियंत्रण अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील वैयक्तिक आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये, तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. ६९/अर्थ१९,दि.२२/०६/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२३१५१८३९७३२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.08.23 17:06:30 +05'30'

रविंद्र दि.औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभा, मंत्रालय, मुंबई.